मुलींच्या बालवीर (स्काउट) संघटनेची संस्थापक



# ज्यूलियेट गोरडन लो

आज बहुतांशी लोक मला *ज्यूलियेट* नावाने ओळखतात. पण माझ्या परिचयाचे लोक मला *डेझी* म्हणत. माझा जन्म 1860 साली हॅलोवीन सणाच्या दिवशी झाला. मी जन्मल्यावर लगेच अमेरिकन नागरी युद्ध सुरू झालं. आम्ही त्याला *राज्यांमधलं युद्ध* म्हणत असू.

तुम्ही अमेरिकेच्या उत्तर भागातले असाल तर तुम्हाला *यांकी (रहिवासी)* म्हटले जाई. तुम्ही दक्षिण भागातले असाल तर तुम्हाला *रिबेल (बंडखोर)* म्हटले जाई.

यानुसार मी *बंडखोर* होते. माझे वडिलसुद्धा *बंडखोर* होते. आई म्हणायची, बाबा सर्वात शूर सैन्याधिकारी आहेत.



माझी आईसुद्धा *बंडखोर* होती. पण तिचे बरेचसे नातलग *यांकी* होते. मी खूप लहान होते तेव्हा एकदा *यांकी* सैन्य कवायत करत आमच्या सव्हाना शहरात आले.

एक *यांकी* सैन्याधिकारी आम्हाला भेटायला आला. मी थेट त्यांच्याकडे गेले आणि त्यांना विचारलं, “तुमच्या हाताला काय झालं?”

“एका *बंडखोरा*ने बंदुकीची गोळी झाडून माझा हात जखमी केला,” ते म्हणाले.

“कदाचित माझ्या वडिलांनी गोळी झाडली असेल. त्यांनी खूप साऱ्या *यांकीं*ना मारलंय.”

माझं बोलणं ऐकून ते हसू लागले.

*यांकी* लोक आल्यामुळे आमचं सव्हाना शहर खूप असुरक्षित झालं.

आमचे एक काका आम्हाला शिकागोला घेऊन जाण्यासाठी आले. युद्ध संपेपर्यंत आम्ही शिकागोला राहाणं योग्य होतं. खरंतर, आई तिथे येऊ इच्छित नव्हती. पण उत्तर भागात आम्ही सुरक्षित राहू, हे ती जाणत होती.



मला शिकागोबद्दल फारसं आठवत नाही. पण आजीने सांगितलेल्या काही गोष्टी मात्र माझ्या लक्षात आहेत. त्यातली माझ्या पणजीची, *एलेनॉर लिटल किन्झी*ची गोष्ट मला खूप आवडते. ती तरूण असताना तिला *सेनेका इंडियन* जमातीच्या लोकांनी पळवून नेलं. त्या लोकांनी तिच्यावर खूप माया केली. ते तिला आपल्याच कुटुंबाचा सदस्य मानू लागले. ते तिला *मोठ्या शिडाचं छोटंसं जहाज* म्हणत.

"ते तिला असं का म्हणत?" मी विचारलं.

"कारण एखादं काम हातात घेण्याआधी ती दृढ निश्चय करत असे. ते काम करायचं मनावर घेतलं की ते कितीही कठीण का असेना, ती पूर्ण करत असे. तुझी आईसुद्धा अगदी तशीच आहे आणि हो डेझी, तू सुद्धा!" आजी म्हणाली, "काही वर्षांनंतर एलेनॉर आपल्या कुटुंबात परतली. पण ती आपल्या इंडियन कुटुंबाला कधी विसरली नाही.

आजीने सांगितलेलं हे *मोठ्या शिडाचं छोटंसं जहाज* माझ्या मनात घर करून गेलं. ज्यांची भाषासुद्धा कळत नाही त्यांच्याशी मैत्री! कल्पनाही करवत नाही.



आम्ही शिकागोत असताना एक वाईट बातमी कळली. आम्ही युद्ध हरलो होतो. आणखी काही काळ शिकागोतच थांबून मग आम्ही सव्हानाला आमच्या घरी गेलो. तिथलं आमचं घर सुरक्षित आहे हे पाहून मला आणि माझ्या बहिणींना हायसं वाटलं. आमच्या शेजारी आमच्या दूरच्या नात्यातली भावंडं राहात. त्यातले तीन गोरडन परिवारातली होती आणि इतर सगळी अँडरसन परिवारातली!

एकदा आम्ही चिक्की बनवली. माझा चुलत भाऊ रँडॉल्फने गूळ वितळवून त्याची कँडी बनवण्यात मला मदत केली. कँडी गरम होती आणि तिचा रंग मधासारखा तपकिरी होता. रँडॉल्फ माझ्याकडे पाहून म्हणाला, “हे बघ डेझी, या कँडीचा रंग अगदी तुझ्या केसांसारखा आहे.”

मग मी कँडी माझ्या वेणीजवळ नेली. “खरंच की, माझ्या केसांना ही कँडी लावली तर कुणाला कळणारसुद्धा नाही,” मी म्हणाले आणि केसांना कँडी लावली. ते पाहून आईने माझी चांगलीच खरडपट्टी काढली. पण तोवर कँडी सुकून गेली होती. आईने ती माझ्या केसांतून कापून काढली.

कित्येकदा मला वाटतं, माझ्या कल्पना माझ्या अकलेपेक्षा पुढे धावतात. मला हसू आलं. नवनवीन प्रयोग करण्यात धोके असणारच. पण हे प्रयोग एवढे मजेशीर असतात की ते करून पाहिल्याशिवाय चैनच पडत नाही.



उन्हाळ्याच्या सुट्टीत आम्ही सगळी भावंडं काकीच्या शेतातल्या *इटोवा क्लिफ* या घरी राहायला गेलो.

*इटोवा क्लिफ*मध्ये मला वेगवेगळ्या कल्पना सुचत. एकदा मी आणि माझी बहीण नेलीने पीच फळाचं एक वेगळंच सरबत बनवलं. आम्ही ते आमच्या इतर भावंडांना विकलं. माझ्या सगळ्यात धाकट्या बहिणीला, ॲलिसलासुद्धा *इटोवा क्लिफ* खूप आवडत असे.

लवकरच उन्हाळ्याची सुट्टी संपली. मला शाळेतही जायचं होतं. चौदा वर्षांची असताना मी व्हर्जिनिया शहरातल्या *स्टुअर्ट हॉल* या बोर्डिंग शाळेत जाऊ लागले.

नंतर मी न्यूयॉर्क शहरातल्या एका दुसऱ्या बोर्डिंग शाळेत जाऊ लागले. तिथे फक्त फ्रेंच भाषेत बोलावे लागे. मला ते खूप अवघड जाई. पण तेव्हा मला *मोठ्या शिडाचं छोटंस जहाज* असलेली माझी पणजी आठवली. ती कशी इंडियन जमातीची भाषा सहजपणे शिकली! मग मी का नाही नवीन भाषा शिकू शकत?

मला पदवी मिळण्याआधी ॲलिसला एक संसर्गाचा ताप आला आणि त्यात तिचा मृत्यू झाला. मला प्रिय असलेल्या कुणाचा मृत्यू मी यापूर्वी कधी अनुभवला नव्हता. त्यामुळे ॲलिसची मला खूप आठवण येईल, याचा मला अंदाज आला नाही.



22 वर्षांची झाल्यावर मला जग फिरून बघावसं वाटू लागलं. मी आधी इंग्लंडला गेले. तिथे मी आमच्या परिचयातल्या लो कुटुंबात राहिले. केटी, हेटी आणि ॲमी या त्यांच्या मुलींशी माझी चांगली गट्टी जमली. त्यांचा भाऊ विली मला खूप आवडला. काही वर्षांनंतर त्याच्याशी माझं लग्न जमलं.

मला भटकायला आणि नवनव्या लोकांशी मैत्री करायला आवडे. मला जग खूप रोमांचक वाटत असे. दरम्यान माझ्या कानामध्ये काही दोष उद्भवला. मी सव्हानातल्या एका डॉक्टरकडे गेले. पेपरमध्ये वाचलेला नवा *सिल्व्हर नायट्रेट* उपचार करण्याचं मी डॉक्टरला सुचवलं.

“नक्की तुम्हाला *सिल्व्हर नायट्रेट*चा उपचार करायचाय, मिस गोरडन?” डॉक्टरने विचारलं.

“हो, नक्की!” मी म्हणाले, “मला वाटतं त्याने माझ्या कानातला दोष दूर होईल.”

पण या उपचारानंतर कानाची परिस्थिती आणखीनच बिघडली. कानातून रक्त येऊ लागलं. कमजोरीमुळे मला उठून उभं राहाणंसुद्धा जमेना. बरी झाले तेव्हा त्या कानाची ऐकण्याची क्षमता नाहिशी झाली होती. आधी म्हटल्याप्रमाणे, माझे प्रयोग काही वेळा फसतात.



पण नंतर परिस्थिती आणखी बिघडली. मी आणि विली लग्न करून निघालो तेव्हा लोकांनी शुभशकुन म्हणून आमच्यावर तांदळाचे दाणे टाकले. त्यातला एक दाणा माझ्या चांगलं ऐकू येणाऱ्या कानात गेला. त्या कानालाही संसर्ग झाला आणि मी पुन्हा आजारी पडले. नंतर बरी झाल्यावर माझी ऐकण्याची क्षमता जवळजवळ नाहिशी झाली होती.

मला फार वाईट वाटलं. पण समस्यांना तोंड द्यायलाच हवं. माझ्या पणजीने म्हणजे, *मोठ्या शिडाच्या छोट्याशा जहाजाने* हेच केलं होतं.

कानाच्या यंत्राने मला काहीशी मदत केली. मग विली आणि मी त्याच्या इंग्लंडच्या घरात राहायला आलो. मला लोकांना मेजवान्या द्यायला खूप आवडे. आमचे बरेचसे पाहुणे आमच्यासोबत शिकारीवर येत. विली आणि मी राणी व्हिक्टोरियाला पाहाण्यासाठी बकिंगहॅम राजवाड्यातसुद्धा गेलो.

मी भरपूर भटकले, नवनवीन लोकांशी मैत्री केली. फ्रान्स, भारत, इजिप्त हे देश मला खूप भावले. पण सव्हाना हे माझं सर्वात आवडीचं ठिकाण होतं. मी माझ्या कुत्र्यांना आणि पोपटालाही या सगळ्या ठिकाणी घेऊन गेले.



1898 साली स्पेन आणि अमेरिका यांच्यात युद्ध सुरू झालं. माझे वडील तोवर ब्रिगेडियर जनरल बनले होते. माझी आई वडिलांसोबत मियामी शहरात गेली. तिथे जखमी, आजारी सैनिकांसाठी हॉस्पीटल सुरू करायचं होतं. मी इंग्लंडहून पुढच्याच जहाजाने अमेरिकेला गेले. मला हॉस्पीटलला मदत करायची होती.

बरेचसे सैनिक विषमज्वराने आजारी होते. हॉस्पीटलमध्ये मी स्वयंपाकघर सांभाळू लागले. तिथल्या गरम हवेत काम करणं जिकिरीचं होतं.

तिथे खाण्यापिण्याचे पदार्थ कमी होते – विशेषतः दूध. मी दूधाच्या शोधात इकडे-तिकडे भटकले, शेतकऱ्यांशी संवाद साधला, त्यांना जखमी, आजारी सैनिकांबद्दल सांगितलं. एकदा मी कुणा शेतकऱ्याच्या कुरणात गायीचं दूध काढत बसले. हे दूध मी एका बादलीत भरून ठेवलं. मी कधीही रिकाम्या हाताने परतली नाही. विचार करणारी व्यक्ती कोणत्याही परिस्थितीत स्वतःला व इतरांना मदत करू शकते, असं मला वाटतं.



युद्ध संपल्यावर मी इंग्लंडला परतले. विली आजारी पडला होता. 1905 साली त्याचं निधन झालं. मला खूप उदास आणि एकाकी वाटू लागलं. गेल्या 45 वर्षांत प्रथमच मला काही कल्पना सुचेनाशा झाल्या.

थोडी शोधाशोध केल्यावर मला एक उपक्रम सापडला. माझी भेट सर रॉबर्ट बेडेन पॉवेलशी झाली. त्यांनी *बॉय स्काउट* नावाचा एक गट सुरू केला होता. ही मुलं गर्द जंगलात आणि पर्वतांमध्ये जिवंत राहाण्यासाठी काही कौशल्य शिकत. सर पॉवेल खूप उत्साही होते. साहजिकच माझ्यातही थोडा उत्साह संचारला.

“किती रोमांचक! मला मुलींना स्काउटींग शिकवायला आवडेल,” मी त्यांना म्हणाले.

“डेझी, तू लवकरात लवकर मुली जमवून त्यांना स्काउटींग शिकवायला सुरुवात कर. इथे आम्ही अशा मुलींना *गर्ल गाईड्स* म्हणतो.”

मला स्फूर्ती मिळाली. मी जमवलेल्या मुलींनी प्रथमोपचार, नकाशावाचन, इशाऱ्यांची भाषा, गाठ बांधणे आणि स्वयंपाक ही कौशल्ये शिकली. मला जाणवलं, साऱ्या जगातल्या मुलींना स्काउटींगची कौशल्यं शिकायला नक्कीच आवडेल. यासाठी मी योजना आखू लागले. मग मी अमेरिकेला जाण्याचं जहाज पकडलं.



सव्हानाला पोहोचल्यावर मी प्रथम माझ्या जुन्या प्रिय मैत्रीणीला, नीना पापेला फोन केला.

“लवकर भेटायला ये. माझ्याकडे सव्हानाच्या मुलींसाठी, साऱ्या अमेरिकेच्या मुलींसाठी एक उपक्रम आहे. आज रात्रीच आपण तो सुरू करू,” मी तिला म्हटलं.

मी नीनाला स्काउट आणि गाइडबद्दल सांगितलं. त्यातली कौशल्यं शिकल्यावर मुलींचा आत्मविश्वास वाढेल, त्या जंगलात स्वत:चे रक्षण करू शकतील, त्या नवनवीन ठिकाणे शोधतील आणि सोबतच इतर गरजवंतांनाही मदत करू शकतील.

“मी आयुष्यभर हेच करण्याचा प्रयत्न केला. मला खात्री आहे की मुलींना ही कौशल्यं देण्यासाठी मी मदत करु शकते,” मी म्हणाले.

आता मी भटकंतीदरम्यान जोडलेला सगळा मित्रपरिवार मदतीस आला. मी एका शहरातून दुसऱ्या शहरात गेले. तिथे लोकांशी गप्पा मारल्या, चर्चा केल्या. मोठ्या प्रमाणात मुली या उपक्रमात सहभागी व्हायला तयार झाल्या. मी वेगवेगळ्या ठिकाणी गट स्थापन केले आणि त्यांचे-त्यांचे पुढारी निवडले. ही माझ्या आयुष्यातली सगळ्यात सुंदर मोहीम होती.



पहिलं महायुद्ध सुरू झाल्यावर गर्ल स्काउट्सना युद्धात मदत करण्याची संधी मिळाली. मी आता थकत चालले होते आणि वारंवार आजारी पडत होते. तरीही मी आपल्या गर्ल स्काउट्ससोबत हॉस्पीटल आणि कँटीनमध्ये मदत करायला जात असे. मला माझ्या मुलींचा खूप अभिमान वाटत असे.

युद्ध समाप्तीनंतर आम्ही शांती प्रस्थापित करण्याबद्दल विचार करू लागलो. माझ्या पूर्वजांनी अमेरिकेत शांती प्रस्थापित करण्यात मोठं योगदान दिलं होतं. माझ्या पणजी (*मोठ्या शिडाचं छोटेसं जहाज*) ने *सेनेका इंडियन* लोकांना समजून घेण्याचा पूर्ण प्रयत्न केला होता. मग गर्ल स्काउट मुली इतर देशांतील मुलींना का भेटू नयेत? त्यांच्याशी मैत्री का करू नये? त्यानंतर मी जागतिक शिबीर आयोजीत करू लागले. तिथे वेगवेगळ्या देशांच्या गर्ल स्काउट्सची आपापसांत ओळख होऊ लागली आणि शांती व सदिच्छा यांचा प्रसार होत गेला.



अमेरिकन गर्ल स्काउटच्या पहिल्या शिबीराचं नाव माझ्या नावावरून, *ज्यूलियेट लो शिबीर* असं ठेवण्यात आलं. हे शिबीर जॉर्जिया राज्यातल्या लुकआऊट पर्वतामध्ये होतं. पहिल्या शिबीराचा अनुभव उत्साहवर्धक होता. संध्याकाळी मी मुलींना शेकोटीभोवती गोल बसवून गोष्टी ऐकवल्या. मुलींना माझ्या पणजीची *मोठ्या शिडाचं छोटंसं जहाज* ही गोष्ट खूप आवडली.

1926 सालचं शिबीर माझ्यासाठी अविस्मरणीय ठरलं. त्यावर्षी आम्ही जागतिक शिबीर आयोजित केलं. त्यात सहभाग घेण्यासाठी मुली जगाच्या कानाकोपऱ्यातून न्यूयॉर्कला आल्या. त्यावेळी मी कॅन्सरने आजारी होते. पण त्या शिबीरातल्या प्रत्येक क्षणाचा आनंद मी लुटला.

हॉलंडच्या मुलींनी मला एक बाहुली भेट दिली. ही बाहुली सतत माझ्यासोबत राहिली. रात्रभर शेकोटीभोवती मुली आपापल्या देशाच्या गोष्टी सांगत होत्या. मुलींची एकमेकांशी मैत्री झाली याचं मला खूप बरं वाटलं. “शांतीच्या मार्गावर हे एक चांगलं पाऊल आहे,” असं मला वाटलं.





एकदा माझ्या जन्मदिवशी मी गर्ल स्काउटला पत्र लिहिलं:

“तुम्ही सगळे नोव्हेंबरमध्ये गर्ल स्काउट्स आठवडा साजरा करायला जमणार आहात. तेव्हा जगातील सर्व गर्ल स्काउट आणि गाइड मुलींचाही विचार करा. स्काउटींगला आपल्या आयुष्याचं अभिन्न अंग बनवा जेणेकरून लोकांना गर्ल स्काउटचा अर्थ उमगेल आणि ते म्हणू लागतील, “ती गर्ल स्काउट आहे.”

लोकांनी माझं असं स्मरण करावं, अशी माझी इच्छा आहे

समाप्त